प्रादेशिक पर्यटन विकास योजनेंतर्गत सन २०२१-२२ मध्ये पर्यटन संचालनालयामार्फत करण्यात येणाऱ्या कामांसाठी सल्लागार शुल्क इ.साठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०२१/१२/प्र.क्र.८४२/ पर्यटन,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : २१ जानेवारी, २०२२.

**संदर्भ :-** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ६.०४.२०२१.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१

**शासन निर्णय :**

राज्यातील पर्यटन स्थळांच्या विकासासाठी सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणे, आज्ञावली तयार करण्याची कामे पर्यटन संचालनालयाकडे सोपविण्यात आली आहेत. सदर कामांकरीता खालीलप्रमाणे रुपये २१०.५७ लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी दहा लक्ष सत्तावन्न हजार फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

(रु.लक्षात)

| अ.क्र. | कामाचे नाव | निधी वितरणास मान्यता (रुपये लक्षात) |
|---|---|---|
| १ | बीच शॅक योजने अंतर्गत वास्तुविशारद यांची शुल्क अदा करणे | ४४.४२ |
| २ | जव्हार पर्यटन आराखडा तयार करण्याचे सल्लागार शुल्क अदा करणे | २५.०० |
| ३ | देवकुंड धबधबा पर्यटनदृष्ट्या विकास करण्यासाठी आराखडा तयार करण्याचे सल्लागार शुल्क अदा करणे | २५.०० |
| ४ | कुडा लेणी विकास आराखडा तयार करण्याचे सल्लागार शुल्क अदा करणे | २५.०० |
| ५ | एकविरा देवी येथे फनिक्युलर ट्रॉली प्रकल्प सविस्तर अहवाल तयार करण्याचे सल्लागार शुल्क अदा करणे | २५.०० |
| ६ | राजगड किल्ला येथे रोप वे तयार करण्यासाठी सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याचे सल्लागार शुल्क अदा करणे | २५.०० |
| ७ | राज्य वस्तु व सेवा कर परतावा यासाठी आज्ञावली, प्रादेशिक पर्यटन विकास योजनेकरीता डॅशबोर्ड व बिच शॅक्स पॉलिसीकरीता आज्ञावली (Software)तयार करणेसाठी आगाऊ रक्कम (५०%) महाआयटी यांना वितरीत करणेबाबत | ३८.६५ |
| ८ | महाबळेश्वर-पांचगणी इको सेन्सिटिव्ह झोनचा आराखडा सुधारीत करणे करीता सल्लागार शुल्क अदा करणे | २.५० |
| | **एकूण** | **२१०.५७** |

२. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ६.०४.२०२१, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार व अधिकाराच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत असून या परिपत्रकामधील प्रत्येक अटींची पूर्तता करण्यात आली आहे. तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ६.०४.२०२१, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ च्या परिशिष्टामधील तपासणीसूची बाबींची पूर्तता करण्यात आली आहे.

३. **अटी व शर्ती :-**

१) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदार पर्यटन संचालनालय यांची राहील तसेच जादा खर्चा प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च ३१ मार्च, २०२२ पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

४. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०२१-२२ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखाशीर्ष **"मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरीता अनुदाने (३४५२ १९५८) ३१, सहायक अनुदान"** या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. मंजूर करण्यात आलेल्या सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता मुख्य लेखाधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम त्यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथे देयके सादर करुन संबंधितांना वितरीत करावी व कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास एक महिन्यात सादर करावा.

५ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सकेतांक २०२२०१२११६५४५६९३२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8,
serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef79cfab47d9345,
cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2022.01.25 14:40:40 +05'30'

**( र.ज.कदम )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई

२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
५. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय / अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***